मौजे तिवरे, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी येथील तिवरे धरण फुटल्याने दुर्घटनाग्रस्त झालेल्या गावाच्या बाधित घरांचे पुनर्वसनासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एलएफडी २०२२/प्र.क्र.३१/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक २८ मार्च २०२३

**वाचा -**

१) मा. राष्ट्रीय मानवाधिकार आयोग यांचेकडील केस क्र.१२२०/१३/२५/२०१९, दि.२४/०५/२०२२
२) जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र. ससाशा/कार्या ७/ तिवरे पुनर्वसन/२०२२, दि.०३/०८/२०२२

**प्रस्तावना -**

दि.०२ जुलै, २०१९ रोजी मौजे तिवरे, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी येथील जलसंधारण विभागाच्या मालकीचे तिवरे धरण फुटून झालेल्या दुर्घटनेतील तिवरे-भेंदवाडी गावातील कुटूंबे बाधित झाली आहेत. अशा बाधित झालेले ५६ घरांचे मौजे अलोरे, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी येथील स. नं. १०४ व स. नं. १०५ या जागेमध्ये पुनर्वसन करण्याचे प्रस्तावित आहे. श्री. सिद्धिविनायक गणपती मंदिर न्यास, मुंबई यांनी विधी व न्याय विभाग यांचेकडील शासन निर्णय क्र. एसव्हीटी १११९/६४१/प्र.क्र. १३१/का.१६, दि.०७.०८.२०१९ अन्वये "एक विशेष बाब" म्हणुन मौजे तिवरे येथील बाधितांचे पुनर्वसन करण्यासाठी रु.०५.०० कोटी इतके अर्थसहाय्य केले आले. तथापि उर्वरित ३२ घरांसाठीच्या बांधकामासाठी शासनाकडे घरकुल योजनेच्या धर्तीवर अर्थसहायाची मागणी केली आहे. उर्वरित ३२ घरांच्या बांधकामास व पुनर्वसित ठिकाणच्या नागरी सुविधेच्या कामास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

दि.०२/०७/२०१९ रोजी मौजे तिवरे ता. चिपळूण जि. रत्नागिरी येथील तिवरे धरण फुटील्यामुळे झालेल्या दुर्घटनेतील बाधित व भविष्यात धोका असलेल्या आपत्तग्रस्त ५६ घरांच्या पुनर्वसनास पुनर्वसनाच्या प्रचलित नियमानूसार व अस्तित्वात असलेल्या धोरणानूसार मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर धोरणानूसार तिवरे येथील उर्वरित ३२ घरांच्या बांधकामासाठी घरकुल योजनेच्या धर्तीवर तसेच आपादग्रस्तांचे पुनर्वसन करण्यासाठी सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.५२,८०,०००/- एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६, २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य ०२ पूर व चक्रीवादळे इ. ११३ घर दुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानका व्यतिरिक्त खर्च (९२) (०१) घरांची दुरुस्ती/पुनबांधणी यासाठी सहाय्य (२२४५ २३२७) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणेस उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. तसेच पुनर्वसित गावांतील नागरी सुविधा शासनाच्या दि.१४.१०.२०२२ च्या शासन निर्णयानूसार अनुज्ञेय असतील. पुनर्वसित गावांतील नागरी सुविधांचा खर्च मागणी क्र. सी. ६ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य ०२ पूर व चक्रीवादळे इ. (१०१) अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानका व्यतिरिक्त खर्च (९२) (०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरीता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधावरील खर्च (२२४५ २२२९) ३१. सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) यामधून भागविण्यात यावा.

३. बाधित झालेल्या ५६ कुटूंबापैकी फक्त ३२ बाधित कुटूंबानाच याचा लाभ अनुज्ञेय करण्यात यावा. याबाबत कोणतीही अनियमितता झाल्यास त्याची संपूर्ण जबाबादारी संबंधित यंत्रणेची राहील. तसेच मौजे अलोरे, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी येथील स. नं. १०४ व स. नं. १०५ या जागेमध्ये पुनर्वसित केलेल्या एकूण ५६ घरांसाठीच्या पुनर्वसित भागात नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतील. त्यासाठी संबंधित यंत्रणेद्वारे तांत्रीक मान्यतेसह अंदाजपत्रक

शासन मान्यतेकरीता शासनास सादर करण्याची जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांची राहील. तसेच या बाधित गांवाचे पुनर्वसन करण्यासाठी उद्योजकांमार्फत, स्वयंसेवी संस्थेमार्फत वा इतर संस्थामार्फत प्राप्त होणाऱ्या सहयोगास शासन प्रतिसाद देईल.

४. शासन निर्णय दि.१४.१०.२०२२ मधील तरतुदीनूसार पुनर्वसनाची कार्यवाही करण्यात यावी.

५. सदर मंजूर निधीच्या अनुषंगाने सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत शासनास तसेच महालेखापाल कार्यालयास सादर करावे. तसेच सदर रकमेचे ताळमेळाचे विवरणपत्र महालेखाकार कार्यालयाकडून करुन घेण्यात यावे.

६. सदर निधी विभागिय आयुक्त, कोकण विभाग यांना बीम्स प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसुल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१९२४१८९०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.31 12:52:01 +05'30'

**(चु. रा. निखारे)**
**कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई
३. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई - १, नागपूर- २
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई- १, नागपूर-२
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
७. वित्तीय सल्लागार व सह सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-९ / अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई.
९. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११ / आव्यप्र-२/ब-१/पीएसी/पीएसी-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. निवडनस्ती कार्यासन -१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

------